राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना व कार्यक्रम याकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (TCS) प्राप्त झालेला केंद्र हिस्सा निधी वितरीत करणेबाबत. **(२२१० F७३८).**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र. क्र. ०५ / कार्यासन. ०६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: -१९ ऑक्टोंबर, २०१८.

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.४.०८.२०१८

३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.एनएचएम -०६१८ /प्र.क्र.३४७ / आरोग्य- ७.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य-०३-ग्रामीण आरोग्य सेवा-विषमचिकित्सा, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान ( केंद्र हिस्सा ), (२२१० F७३८ ), ३१ -सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर ) या शिर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षाकरिता रु. १३४२३.०६ लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर निधीतून रु.४६६३.०० लाख इतका निधी सार्वजनिक आरोग्य विभागास अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आलेला आहे.

२. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या वाचा क्र. ३ येथील प्रस्तावानुसार केंद्र शासनाने उपरोक्त योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु. ८३०.०० लाख इतका निधी वितरीत केलेला असुन सदर निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा असल्याचे वित्त विभागाने प्रमाणित केले आहे. सबब, केंद्र शासनाकडून आदिवासी घटक कार्यक्रमासाठी (TCS) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यान्वित असलेल्या केंद्र पुरस्कृत योजना व कार्यक्रम याकरिता प्राप्त झालेला केंद्र हिस्सा, (०१) (०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (केंद्र हिस्सा ), (२२१० F७३८ ), ३१-सहायक अनुदाने ( वेतनेत्तर ) या लेखाशिर्षाखाली एकुण रु. ८३०.०० लाख ( अक्षरी रुपये आठ कोटी तीस लाख फक्त ) इतका निधी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पित निधीमधून प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास तसेच सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच अनौपचारिक संदर्भ क्र. ४३३ /अर्थोपाय, दि. २४-०९-२०१८ अन्वये दिलेल्या मंजूरीस अधिन राहून निर्गमित करण्यात येत असून संदर्भाधीन शासन निर्णयातील अटींची पुर्तता होत असल्याची सार्वजनिक आरोग्य विभागाने खात्री करावी.

७ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१११९१६१३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.10.19 15:52:35 +05'30'

( रविंद्र दि. औटे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई

२) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य,मुंबई.

४) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१०) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई

१२) कार्यासन अधिकारी (का. ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१३) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.